**खुल्ताबाद वन परिक्षेत्रांतर्गत विविध वन खंडाच्या हद्दीत संरक्षण भिंतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत ...**

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांक : एस-१०/२०१५/अनौ.२९/प्र.क्र.४४५/फ-३**

**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**

**तारीख: ३ नोव्हेंबर, २०१५.**

**वाचा -**

१) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांचे पत्र क्र.-कक्ष-२४(३) /वअ/ ४२८/१५-१६, दिनांक २४.७.२०१५.

**प्रस्तावना -**

वनाचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सिमांकन योजनेअंतर्गत औरंगाबाद वनवृत्तातील ५ गावातील एकूण ६७२९ र.मी. वनक्षेत्राच्या संरक्षणासाठी संरक्षण भिंत बांधकाम करण्याकरिता रु. ५,०७,०९,१००/- च्या एकूण ५ अंदाजपत्रकास अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, औरंगाबाद यांची तांत्रिक मान्यता घेवून सदर अंदाजपत्रकांस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबतचा प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांनी उपरोक्त संदर्भिय पत्रान्वये शासनास सादर केला होता व सदर प्रस्तावास मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

१) खुल्ताबाद वन परिक्षेत्रांतर्गत २ गावातील एकूण २५५० र.मी. वनक्षेत्राच्या संरक्षणासाठी संरक्षण भिंत बांधकाम करण्याकरिता रु. १,९४,४४,४००/- च्या एकूण २ अंदाजपत्रकास खालील नमूद तपशिलाप्रमाणे प्रशासकीय मान्यता (वित्तीय मान्यता वगळून) प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | प्रशासकिय मान्यता प्रदान रक्कम |
|---|---|---|
| १ | खुल्ताबाद वनपरिक्षेत्रांतर्गत मौजे भावसिंगपूरा येथील वनखंड क्र. १९९ च्या हद्दीवर ९९९.०० र.मी.ची संरक्षक भिंत बांधणे. | रु. ७६,३३,२००/- |
| २ | खुल्ताबाद वनपरिक्षेत्रांतर्गत मौजे मिटमीटा येथील वनखंड क्र. १९८ च्या हद्दीवर १५५१.०० र.मी.ची संरक्षक भिंत बांधणे. | रु. १,२०,००,०००/- |
| | **एकूण** | **रु. १,९६,३३,२००/-** |

२) सदर अंदाजपत्रकास खालील अटी व शर्तीस अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे -

अ) अंदाजपत्रके सन २०१४-१५ च्या जिल्हा दरसुचीवर आधारित आहेत.

आ) अंदाजपत्रकात आकस्मिक खर्चासाठी करण्यात आलेली ३ टक्के तरतूद ४ टक्के अशी सुधारित करण्यात येत आहे.

३) हे आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्र.विअप्र.१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५.०५.२००९ , वित्तीय अधिनियम नियम पुस्तीका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच अनुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र.१, परिच्छेद क्र. १३४ अनुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सहमतीने, निर्गमित करण्यात येत आहे.

४) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०३१६०५४४७८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TIWARI VIRENDRA RAMBAHAL

Digitally signed by TIWARI VIRENDRA RAMBAHAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST,CID - 917243, postalCode=400032, st=Maharashtra, cn=TIWARI VIRENDRA RAMBAHAL
Date: 2015.11.03 16:06:44 +05'30'

**(वीरेंद्र तिवारी)**
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), औरंगाबाद.
५) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख कक्ष), नागपूर.
६) वनसंरक्षक (भूमी अभिलेख), पनवेल / नागपूर.
७) उप वनसंरक्षक, औरंगाबाद.
८) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
९) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१०) वित्त विभाग, व्यय १०/ अर्थसं-४ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
११) कार्यासन अधिकारी (फ-२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) कार्यासन अधिकारी, ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३) निवडनस्ती, कार्यासन (फ-३), म.व.व.वि., मंत्रालय, मुंबई-३२.